सहकारी सूतगिरण्यांना वित्तीय संस्थांकडून मिळणा-या कर्जावरील १२% व्याजाचे प्रदान करणेबाबत - शेतकरी महिला सहकारी सूतगिरणी मर्या., सांगोले, जि. सोलापूर.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र.सूतगि**- ३३२१/**प्र.क्र**.३० /**टेक्स**-१ (**ब**)
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२.
दिनांक : दि. ३१.३.२०२२.

वाचा :-

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. धोरण- १०१६/प्र.क्र.९६/टेक्स-१ (अ), दि.११ जानेवारी, २०१७.

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. संकीर्ण- २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५, दि.१० मे, २०१६ .

३) आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांचे पत्र क्र. कार्या-६(१)/सूतमि/३००० चाती प्रस्ताव/७०५९/२०२१, दि. २५.११.२०२१.

४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अर्थसं- २०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१.

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.धोरण-१०१६/प्र.क्र.९६/टेक्स-१ (अ), दि.११ जानेवारी, २०१७ अन्वये, सहकारी सूतगिरण्यांना वित्तीय संस्थांकडून / रा. स. वि. नि. कडून रु.३,०००/- प्रति चाती प्रमाणे ५ वर्षांच्या मुदतीसाठी कर्ज घेण्यास परवानगी देण्यात आली असून सदर कर्जावरील ५ वर्षांचे कमाल १२% पर्यंतचे व्याज शासन भरणार आहे. ज्या सहकारी सूतगिरण्यांनी यापूर्वी शासनाकडून घेतलेल्या बिनव्याजी कर्जाची परतफेड केली आहे, अशाच सूतगिरण्या ह्या योजनेसाठी पात्र समजण्यात येतील. या शासन निर्णयास अनुसरुन शेतकरी महिला सहकारी सूतगिरणी मर्या., सांगोले, जि. सोलापूर या या सूतगिरणीने सोलापूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक लि., सोलापूर व रायगड जिल्हा मध्यवर्ती बँक, अलिबाग यांच्या सहभाग योजनेंतर्गत प्रती चाती रु.३०००/- प्रमाणे रु.८२३.०० लाख इतके कर्ज घेतले असून सदर कर्जावरील १२% प्रमाणे दि.१.४.२०२१ ते ३०.६.२०२१ या कालावधीतील व्याजाची देय रक्कम सोलापूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक लि., सोलापूर या बँकेस प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.धोरण-१०१६/प्र.क्र.९६/ टेक्स-१ (अ), दि.११ जानेवारी, २०१७ अन्वये शासनाने घेतलेल्या निर्णयास अनुसरुन शेतकरी महिला सहकारी सूतगिरणी मर्या., सांगोले, जि. सोलापूर या सहकारी सूतगिरणीने घेतलेल्या कर्जावरील व्याजाची १२% प्रमाणे ऑक्टोबर, २०१८ ते मार्च २०२१ पर्यंतची रु.१,८४,४४,६२४/- इतकी रक्कम सूतगिरणीस यापूर्वी वितरीत करण्यात आली आहे. आता खालील तक्त्यात दर्शविल्यानुसार स्तंभ क्र.६ मध्ये दर्शविलेल्या बँकेला स्तंभ क्र.५ मध्ये दर्शविल्याप्रमाणे दि.१.४.२०२१ ते दि.३०.६.२०२१ या कालावधीतील व्याजाची रक्कम रु.१३,९७,९६३ /- (रु. तेरा लाख सत्याण्णव हजार नऊशे त्रेसष्ठ) इतक्या रकमेचे प्रदान करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. या सूतगिरणीने थकित बिनव्याजी कर्जाची संपूर्ण परतफेड केल्याची खातरजमा करुन घेऊन सदर व्याजाचे प्रदान करण्यात येत आहे.

| सूतगिरणीचे नाव | चात्यांची संख्या | बिनव्याजी कर्ज घेतले होते काय ? असल्यास त्याची परतफेड केली आहे का? | चात्यांच्या प्रमाणात कोणत्या वित्तीय संस्थेकडून / रा.स. वि. नि. कडून किती कर्ज घेतले आहे ? व व्याजाचा दर | १२% पर्यंतच्या व्याजाची रक्कम व व्याजाचा कालावधी | ज्या खात्यात व्याजाची रक्कम जमा करावयाची त्याचा तपशील |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| Shetkari Mahila Sahakari Sootgirni Maryadit, Sangola, Dist.Solapur | २७४५६ | होय. रु.१,७१,०२,४४८ इतकी संपूर्ण रक्कम परतफेड केली आहे. | रु.८,२३,००,०००/- सोलापूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक, सोलापूर व कोल्हापूर जिल्हा मध्यवर्ती बँक लि., कोल्हापूर यांच्या सहभाग योजनेंतर्गत. व्याज दर - १२.५०% | रु. १३,९७,९६३/- (दि. १.४.२०२१ ते दि. ३०.६.२०२१) | State Bank of India Baliwes Branch, Solapur. Account No. 11087721237 IFSC Code - SBIN0000483 |
| (एकूण रुपये तेरा लाख सत्याण्णव हजार नऊशे त्रेसष्ठ फक्त) | | | | रु.**१३,९७,९६३/--** | |

२. वित्त विभाग, परिपत्रक क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५, दि.१० मे, २०१६ मधील परिच्छेद- अ) नुसार प्रस्तुत प्रकरणाची माहिती खालीलप्रमाणे आहे -

१) विभागास प्रदान वित्तीय अधिकार:- "२०४९ २५५१" या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात रु.२०००.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पित आहे.

२) मंजूर निधी - "२०४९ २५५१" या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात रु.२००० लाख इतका निधी अर्थसंकल्पित आहे. सदर योजना ही अनिवार्य असून भारित स्वरुपाची आहे.

३) मागील ३ महिन्यांपूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे - लागू नाही.

४) ज्या लेखाशीर्षाखाली अनुदान वितरीत करण्यांत येत आहे, त्या लेखाशीर्षांतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही - लागू नाही.

५) स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देतांना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यांत आली आहे - लागू नाही.

६) वैयक्तिक लाभार्थीचे देयक सादर करतांना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे - लागू नाही.

७) बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देतांना सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात असावा - लागू नाही.

८) खरेदी विषयक प्रक्रिया संबंधित अद्यावत शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा - लागू नाही.

९) साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरीत करावी - लागू नाही.

३. यासाठी होणारा खर्च " मागणी क्र. व्ही-१, २०४९- व्याज प्रदाने, ०१ देशांतर्गत ऋणावरील व्याज, २००- देशांतर्गत इतर ऋणांवरील व्याज (०२), इतर संस्थांकडून मिळणा-या कर्जावरील व्याज (०२) (०६) वित्तीय संस्थांकडून मिळणा-या कर्जावरील व्याज (अनिवार्य) (२०४९ २५५१)" भारित ४५- व्याज" या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा .

४. आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी शेतकरी महिला सहकारी सूतगिरणी मर्या., सांगोले, जि. सोलापूर या सूतगिरणीने वित्तीय संस्थेकडून घेतलेल्या कर्जावरील यापुढील कालावधीसाठी देय होणा-या व्याज प्रदानाचा तिमाही अहवाल शासनास सादर करावा.

५. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेली रु.१३,९७,९६३/-(रु. तेरा लाख सत्याण्णव हजार नऊशे त्रेसष्ठ) इतकी रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून आहरीत करुन उपरोक्त परिच्छेद-१ मधील तक्त्यातील स्तंभ क्र.५ मधील व्याजाची रक्कम स्तंभ क्र.६ मध्ये नमूद केलेल्या बँकेच्या खाते क्रमांकामध्ये RTGS द्वारे वितरीत करण्याची कार्यवाही करण्याकरीता श्री सु. पु. पांगारकर, कार्यासन अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२ यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, श्री. स. दि. खरात, उप सचिव (सूतगिरणी), (V०००९), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२ यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेला निधी संबंधित बँकेस वितरीत केल्यानंतर आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर रक्कम प्राप्त झाल्याबाबतचे प्रमाणपत्र संबंधित बँकेकडून प्राप्त करुन घ्यावे व त्याची प्रत शासनास सादर करावी.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.४ येथील दि.२४.०६.२०२१ च्या शासन निर्णयान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३३१११०३४१०००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

PRASENJEET D KARLEKAR

Digitally signed by PRASENJEET D KARLEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=d219c43caa42a6d2c11a62256b2ff3ad939a420c9fb6fa0cb24c384214bcee8c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=58B95820309E7F466AE2AD722C14D2E8910FE2F9D499461E1829267B19AB9CFC, cn=PRASENJEET D KARLEKAR
Date: 2022.03.31 11:06:06 +05'30'

**(प्रसेनजीत कारलेकर)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत**:-

१) महालेखाकार, महाराष्ट्र- १ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षा), मुंबई / नागपूर.
२) मा. मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहायक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) आयुक्त, वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
८) सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई.
९) वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प-३ व १३, मंत्रालय, मुंबई.
१०) अवर सचिव (कार्यासन १७ स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) शाखा व्यवस्थापक, सोलापूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक लि., सांगोला शाखा, जि. सोलापूर.
१२) कार्यकारी संचालक, शेतकरी महिला सहकारी सूतगिरणी मर्या., सांगोले, जि. सोलापूर.
१३) कार्यासन अधिकारी,(रोख शाखा), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई (३ प्रती)
१४) निवड नस्ती ( टेक्स-१ (ब)).